वनशेती उप अभियानाचा सन २०१७-१८ चा अखर्चित निधी पुनरुज्जीवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाशेअ-०७१८/प्र.क्र.२१२/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २१ ऑगस्ट, २०१८

**वाचा**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र.७-७/२०१७-CC, दिनांक २३ एप्रिल, २०१८
२) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र/कृ.आ/फलो-२/शाश्वत शेती/PFMS/१८७९/१८, दि.५ जून, २०१८.
३) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१८/प्र.क्र.११/कार्यासन- ६, दि.२६ जुलै, २०१८.

**प्रस्तावना**

सन २०१७-१८ या वर्षापासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत वनशेती उपअभियान राज्यात राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०: ४० असे आहे. सन २०१७-१८ या वर्षासाठी केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी रु.४०० लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी रु.३५.२५ लक्ष एवढा निधी आर्थिक वर्षा अखेर अखर्चित राहिला. सदर निधीचा कार्यक्रम सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधिन २३ एप्रिल, २०१८ च्या पत्रान्वये पुनर्जिवित करुन दिलेला आहे.

अखर्चित निधीमध्ये सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अनुक्रमे रुपये रु. १९.९०,रु १५.२५ व रु. ०.१० लक्ष एवढया निधीचा समावेश आहे. केंद्र हिश्श्याचा सर्वसाधारण व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा अखर्चित निधी रु.२०.०० लक्ष व समरुप राज्य हिश्श्याचा रु.१४.२६ लक्ष असा एकूण रु.३४.२६ लक्ष निधीचा पुनर्जिवित कार्यक्रम सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यासाठी आयुक्त (कृषी) यांना बीडीएस प्रणालीवर निधी उपलब्ध करुन देण्याच्या प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

१. वनशेती उप-अभियानाचा सन २०१७-१८ या वर्षातील, केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी रु.२०.०० लक्ष (रुपये वीस लक्ष फक्त) व समरुप राज्य हिश्श्याचा आवश्यक निधी रु.१४.२६ लक्ष (रुपये चौदा लक्ष सव्वीस हजार फक्त) असा एकूण रु.३४.२६ लक्ष (रुपये चौतीस लक्ष सव्वीस हजार फक्त) निधीचा पुनर्जिवित कार्यक्रम सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यास शासन मान्यता देऊन सदर निधी वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (BDS) आयुक्त (कृषी) यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधीपैकी, सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा रु.१९.९० लक्ष (रुपये एकोणीस लक्ष नव्वद हजार फक्त) व समरुप राज्य हिस्सा रु.१३.९५ लक्ष (रुपये तेरा लक्ष पंच्याण्णव हजार फक्त), व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा रु.०.१० लक्ष (रुपये दहा हजार फक्त)व समरुप राज्य हिस्सा रु.०.३१ लक्ष (रुपये एकतीस हजार फक्त) याप्रमाणे खर्च करण्यात यावा.

३. सदर निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

| अ.क्र | प्रवर्ग | केंद्र | राज्य |
|---|---|---|---|
| १ | सर्वसाधारण | मागणी क्र.डी-३<br>२४०१,पीक संवर्धन<br>१०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण<br>०१ माहिती व प्रचार,<br>(०१)(५६) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - वन शेती उप अभियान (केंपुयो) (केंद्र हिस्सा ६०%) (सर्वसाधारण) (कार्यक्रम)<br>(२४०१ ए८२४)<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्र.डी-३<br>२४०१, पीक संवर्धन<br>१०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण<br>०१ माहिती व प्रचार,<br>(०१)(५७) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - वन शेती उप अभियान (केंपुयो) (राज्य हिस्सा ४०%) (सर्वसाधारण) (कार्यक्रम)<br>(२४०१ ए८३३)<br>३३ अर्थसहाय्य |
| २ | अनुसूचित जमाती | मागणी क्र.टी-५<br>२४०१, पीक संवर्धन<br>७९६ जनजाती क्षेत्र उप योजना<br>०१ जनजाती क्षेत्र उप योजनेंतर्गत योजना<br>(०१)(३३) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - वन शेती उप अभियान (केंपुयो) (आक्षेपुयो) (केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ए८४२)<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्र.टी-५<br>२४०१, पीक संवर्धन<br>७९६ जनजाती क्षेत्र उप योजना<br>०१ जनजाती क्षेत्र उप योजनेंतर्गत योजना<br>(०१) (३४) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान- वनशेती उप अभियान (केंपुयो) (आक्षेपुयो) (राज्य हिस्सा ६०%) (२४०१ए८५१) |

४. निधी ज्या प्रवर्गासाठी मंजूर करण्यात आला आहे त्या प्रवर्गासाठीच खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. सदर निधी खर्च करण्यासाठी कृषि संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, सदर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

६. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

७. सदर निधी वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थस-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ- ३, दि. २ एप्रिल, २०१८ मधील अटी व शर्तीची कृषी आयुक्तालयाने पुर्तता केली आहे, या अटीच्या अधीन त्याचप्रमाणे आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधीन दि.२६ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या वनशेती उप-अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२११७५८००७६०१असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant
Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c,
serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.08.21 18:03:39 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय,पुणे (१० प्रती)
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. सर्व संचालक /सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
९. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ दिनकरराव देसाई मार्ग,गोरेगाव (पूर्व) मुंबई- ६५
१०. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
११. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१२. सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हा परिषद)
१३. सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर/(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१५. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखा परिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२०
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई
१८. व्यवस्थापकीय संचालक,भूविकास बँक , मुंबई
१९. अध्यक्ष,सर्व जिल्हा परिषदा
२०. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२१. नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
२२. वित्त विभाग ( व्यय-१ वअर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
२३. ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२४. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
२५. मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
२६. निवड नस्ती (कार्यासन -१४अे)